**आंतरराष्ट्रीय / राष्ट्रीय / राज्यस्तरीय आयोजित पर्यटन प्रसिध्दी कार्यक्रमांना पर्यटन विभागामार्फत आर्थिक प्रायोजकत्व उपलब्ध करुन देण्याच्या कार्यपध्दतीत सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**शासन निर्णय क्रमांक महोत्सव-२०१८/१२/प्र.क्र.११२६/पर्यटन-३,**
**दिनांक : ३० एप्रिल, २०२५**

**वाचा :** १) केंद्रीय पर्यटन मंत्रालयाच्या मार्गदर्शक सूचना-१-Event (३७)/२०११, दि.१९/०७/२०१७
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.टिडीसी-२०१४/०२/प्र.क्र.९६/पर्यटन, दि.१२/०४/२०१६.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. महोत्सव-२०१८/१२/प्र.क्र.११२६/ पर्यटन, दि.०७/०१/२०१९.
४) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.टिडीसी-२०१९/०३/प्र.क्र.२२४/पर्यटन, दि.०२/०४/२०१९.
५) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.टिडीसी-२०२२/०९/प्र.क्र.५४२/ पर्यटन-४, दि.१८/०७/२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य भारतातील सर्वाधिक वैविध्यपूर्ण व पर्यटनासाठी आकर्षक राज्यापैकी एक आहे. राज्याची समृध्द संस्कृती, नैसर्गिक सौदर्य, ऐतिहासिक वारसा, सांस्कृतिक महत्व, विविध धार्मिक स्थळे व आधुनिक काळातील पर्यटनाच्या संधीमुळे देश-विदेशातील पर्यटक राज्यात आकर्षित होतात.

२. वाचा क्र.५ येथील दिनांक १८/०७/२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये नवीन पर्यटन धोरणास मान्यता दिली आहे. सदर धोरणांतर्गत आधुनिक पर्यटन संकल्पनांचा अवलंब करुन, पर्यटनाच्या माध्यमातून रोजगार निर्मिती, स्थानिक अर्थव्यवस्थेस बळकटी देणे, पर्यटन क्षेत्रात गुंतवणुकीला प्रोत्साहन देणे व महाराष्ट्र राज्याला जागतिक स्तरावर एक नामांकित पर्यटन हब म्हणून नावारुपाला आणण्याचे नियोजित आहे. त्यानुषंगाने सदर धोरणात राज्याच्या सर्वसमावेशक विकासावर भर देण्यात आला आहे.

३. पर्यटन विभागामार्फत आयोजित कार्यक्रमांव्यतिरिक्त आंतरराष्ट्रीय/ राष्ट्रीय/ राज्यस्तरावर खाजगी आयोजकांमार्फत आयोजित पर्यटन प्रसिध्दी कार्यक्रमांना आर्थिक सहाय्य देण्यासाठीचे धोरण वाचा क्र.३ येथील शासन निर्णयान्वये राज्यात राबविले जात आहे.

४. तथापि, पर्यटन संचालनालयाच्या स्थापनेनंतर प्रसिध्दी हा विषय वाचा क्र.४ येथील शासन निर्णयान्वये पर्यटन संचालनालयाकडे सोपविण्यात आल्याने, तसेच, तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात झपाट्याने प्रगती झाल्याने, पारपांरिक प्रायोजकत्वाच्या प्रस्तावांमध्ये सोशल मिडिया, OTT शो इ. नवीन गोष्टींचा समावेश झाल्याने, तंत्रज्ञानाच्या या बदलास सकारात्मक प्रतिसाद देण्यासाठी वाचा क्र.३ येथील शासन निर्णय,

दिनांक ०७.०१.२०२९ अधिक्रमित करुन, योजनेच्या कार्यपध्दतीत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आंतरराष्ट्रीय/ राष्ट्रीय/ राज्यस्तरावर खाजगी आयोजकांकडून आयोजित केल्या जाणाऱ्या प्रायोजकत्व कार्यक्रमांच्या प्रस्तावाच्या स्वरुपात काळानुरुप झालेल्या बदलांना सकारात्मक प्रतिसाद देण्यासाठी वाचा क्र. ३ येथील शासन निर्णय, दिनांक ०७.०१.२०१९ अधिक्रमित करुन, प्रायोजकत्व कार्यक्रमांना वित्तीय सहाय्य देण्यासाठीच्या खालीलप्रमाणे सुधारित कार्यपध्दतीस शासन मान्यता देण्यात येत आहे :-

**१) योजनेचे स्वरुप** -:

या योजनेअंतर्गत आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय व राज्यस्तरावर खाजगी आयोजकांकडून (खाजगी संस्था/संघटना, स्वंयसेवी संस्था, सहकारी संस्था, कार्यक्रम व्यवस्थापन करणाऱ्या कंपन्या) आयोजित विविध वर्गवारी अंतर्गत कार्यक्रमांना उदा. सांस्कृतिक व वारसा कार्यक्रम, साहसी व पर्यावरण पर्यटन उपक्रम, खाद्य उत्सव, लक्झरी आणि शाश्वत पर्यटन, क्रीडा आणि साहसी पर्यटन कार्यक्रम, MICE (बैठका, प्रोत्साहने, परिषदा आणि प्रदर्शने), चित्रपट आणि मीडिया पर्यटन कार्यक्रम व प्रवास प्रभावक-नेतृत्व मोहिमा, डिजिटल प्रमोशन, FAM टूर्स, डेस्टिनेशन प्रमोशनल कंटेंट (लघुपट, वेब सिरीज, माहितीपट) व टीव्ही, रेडिओ आणि डिजिटल प्लॅटफॉर्मसाठी एपिसोडिक / थीमॅटिक ट्रॅव्हल कंटेंट आणि मोहिमा, मुद्रित माध्यमे, दुरचित्रवाणी व रेडिओ, इव्हेंट व महोत्सव, सार्वजनिक ठिकाणी कार्यक्रम इ. पर्यटन विभागाकडून प्रायोजकत्व स्वरुपात वित्तीय सहाय्य देण्यात येईल.

सदर योजनेंतर्गत पुढील कार्यक्रमांचा समावेश करण्यात येत आहे :-

अ) **खाजगी क्षेत्रामार्फत अर्ज सादर करणारे आयोजक** : महाराष्ट्रातील पर्यटन स्थळांना प्रोत्साहन, प्रसिध्दी व ओळख निर्माण करुन देणाऱ्या महाराष्ट्रातील समृध्द जिवनशैली, लोककला, खाद्यसंस्कृती इ. ची माहिती देऊन, राज्यातील पर्यटनवृध्दीसाठी मदत होईल अशा बाबींकरीता राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय प्रदर्शने, चर्चासत्रे, कार्यक्रम, महोत्सव याव्दारे खाजगी संस्था काही उपक्रम राबवित असतील जेथे मोठ्या प्रमाणामध्ये मिडीयाचा सहभाग आहे, अशा कार्यक्रमांचा समावेश असेल. उदा. उच्च / विशेष दर्जाच्या गोल्फ, फॉमुर्ला-१, स्नुकर, चेस, घोड्यांच्या शर्यती, फिल्म/टी.व्ही. अवॉर्ड, कुंभमेळा इ.

ब) **परदेशात आयोजित करण्यात येणारे कार्यक्रम :-** यामध्ये परदेशातील भारतीय उच्चायुक्तालयामार्फत आयोजित व त्यांच्या शिफारशीनुसार आयोजित, पर्यटन व सांस्कृतिक विषयक कार्यक्रम, रोडशो, सहल आयोजक संस्था इ. कार्यक्रमांचा समावेश असेल.

क) **राज्यातील विविध खाजगी संस्थामार्फत नियमितपणे ३ वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी आयोजित करण्यात येणारे पर्यटनाशी निगडीत कार्यक्रम :-** या अंतर्गत प्राप्त होणाऱ्या प्रस्तावातील कार्यक्रमासाठी उपस्थित असणारे मान्यवर व त्यातून राज्यातील कोणत्या पर्यटन स्थळांची प्रसिध्दी इ.बाबी तपासून कार्यक्रमास प्रायोजकत्व स्वरुपात निधी उपलब्ध करुन देण्याबाबत निर्णय घेण्यात येईल.

i. कार्यक्रमाच्या यशस्वी आयोजनानंतर, सदर कार्यक्रम पर्यटनाच्या दृष्टीने महत्त्वाचा वाटत असल्यास व सदर कार्यक्रम पर्यटन संचालनालय किंवा महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ किंवा संयुक्तपणे आयोजित करणार असेल, तर असा कार्यक्रम पर्यटन विभागाच्या वार्षिक पणन व ब्रँडिग (Tourism Marketing and Branding Plan) कृती आराखड्याचा कायमस्वरुपी भाग होऊन या कार्यक्रमांना संपूर्ण प्रायोजकत्व पर्यटन विभागामार्फत उपलब्ध करुन देण्यात येईल. तथापि, सदर कार्यक्रम संस्थेमार्फतच पार पडणार असेल व महाराष्ट्राच्या पर्यटनात्मक प्रसिध्दीकरीता आवश्यक वाटत असेल, तर अशा कार्यक्रमांना काही अंशी प्रायोजकत्व उपलब्ध करुन देता येईल.

ii. ज्या कार्यक्रमांचे आयोजन पर्यटन विभागामार्फत करणे शक्य नाही व सदर कार्यक्रमांच्या आयोजनाबाबतची वार्षिक आखणी विहित वेळेत करण्याकरीता, अशा संस्थेस दीर्घकालीन स्वरुपामध्ये (२-३ वर्षाकरीता) उच्चस्तर समितीच्या शिफारशीनंतर मा.मंत्री (पर्यटन) यांच्या मान्यतेने प्रायोजकत्व उपलब्ध करुन देण्याबाबत अंतिम निर्णय घेण्यात येईल. तसेच, सदर कार्यक्रमास स्थायी स्वरुपाची दरवर्षी एक निश्चित रक्कम ठरवून सदर संस्थेस प्रायोजकत्वाकरीता कायम करण्याचे अधिकार उच्चस्तर समितीच्या शिफारशीनंतर मा.मंत्री (पर्यटन) यांना राहतील.

**ड) पर्यटन विभागामार्फत तयार करण्यात आलेल्या पर्यटन विषयक साहित्याची (कंटेंट्स) प्रसिध्दी करण्यासाठी नामांकित व लोकप्रिय वाहिन्यांना प्रायोजकत्व उपलब्ध करुन देण्याबाबत :-**

i. राज्याच्या पर्यटन प्रसिध्दीकरीता प्रसार भारती व इतर OTT प्लॅटफॉर्म वर Digital Marketing करण्यासाठी प्रायोजकत्व उपलब्ध करुन देता येईल.

ii. विविध वाहिन्यांवरील लोकप्रिय कार्यक्रमादरम्यान पर्यटन विषयक जाहिरात करण्याकरीता प्रायोजकत्व देता येईल.

iii. यूट्यूब, इंस्टाग्राम, फेसबुक इ. तत्सम सोशल मिडीया माध्यमांव्दारे कार्यक्रमांच्या दर्शकसंख्येच्या (Viewership) आधारे, प्रायोजकत्व उपलब्ध करुन देता येईल.

**इ) Social Media Influencer यांच्यामार्फत तयार करण्यात येणाऱ्या पर्यटन विषयक साहित्यासाठी त्यांच्या फॉलोअर्स संख्येच्या आधारे राज्याची पर्यटनात्मक प्रसिध्दी करण्यासाठी प्रायोजकत्व** :-

i. या अंतर्गत Influencer व्दारे सामाजिक माध्यमांवरील (Social Media) सर्व माध्यमे मिळून १० लक्ष पेक्षा जास्त फॉलोअर्स असणाऱ्या प्रभावशाली व्यक्तीमत्वांव्दारे राज्यातील राज्यातील पर्यटन स्थळांची प्रसिध्दी करण्याच्या अनुषंगाने पर्यटन संचालनालयामार्फत ऑनलाईन प्रणालीव्दारे प्रस्ताव सादर करण्यात येतील.

ii. सदर Influencer व्दारे दरमहा पर्यटन विभाग / पर्यटन संचालनालय / महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत तयार करुन देण्यात आलेले ०५ कंटेट्स पोस्ट करणे आवश्यक राहील. तसेच, त्यांच्याव्दारे राज्यातील पर्यटन प्रसिध्दीविषयक ०५ कंटेट्स रिपोस्ट करणे आवश्यक राहील.

iii. यासाठी १० लक्ष पेक्षा जास्त फॉलोअर्स असणाऱ्या Influencer ना प्रतिमहा रु.१.०० लक्ष या प्रमाणे तीन महिन्यापर्यंत प्रायोजकत्व अनुज्ञेय राहील. तसेच, Influencer च्या फॉलोअर्स संख्येनुसार प्रायोजकत्वामध्ये वाढ करण्यात येईल.

iv. Influencer स्वत:चे कंटेट्स तयार करणार असेल तर सदर कंटेट्स पोस्ट करण्यापूर्वी पर्यटन संचालनालयाची मान्यता आवश्यक राहील.

उपरोक्त 'अ' 'ब' 'क' 'ड' व 'इ' अन्वये प्राप्त होणाऱ्या प्रायोजकत्व प्रस्तावाचे पर्यटन विषयक महत्त्व, कार्यक्रमास उपस्थित राहणारे मान्यवर व प्रसार माध्यमातून घेतलेली जाणारी दखल इ. बाबी तपासून प्रायोजकत्वाबाबत अटी व शर्ती शिथिल करण्याचे अधिकार उच्चस्तर समितीस असतील.

**२) प्रायोजकत्वाकरीता उच्चस्तर समितीचे गठण :-**

सदर योजनेअंतर्गत पात्र संस्था व कार्यक्रम यांची मा.मंत्री (पर्यटन) यांना शिफारस करण्यासाठी सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव (पर्यटन) यांचे अध्यक्षतेखाली उच्चस्तर समिती गठीत करण्यात येत आहे. समितीची रचना व कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

**अ) उच्चस्तर समितीची (High Level-Committee) रचना :-**

| अ.क्र. | नाव/पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, पर्यटन विभाग | अध्यक्ष |
| २. | संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई. | सदस्य |
| ३. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई | सदस्य |
| ४. | संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय | सदस्य |
| ५. | सह / उप सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ६. | सह / उप सचिव नियोजन विभाग | सदस्य |
| ७. | सह / उप सचिव, गृह विभाग | सदस्य |
| ८. | सह / उप सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| ९. | सह / उप सचिव (पर्यटन-३), पर्यटन विभाग | सदस्य सचिव |

**ब) उच्चस्तर समितीची कार्यकक्षा :-**

i. उच्चस्तर समितीची बैठक माहे, जानेवारी, मार्च, मे, जुलै, सप्टेंबर, नोव्हेंबर व डिसेंबर मधील दुसऱ्या आठवड्यात आयोजित करणे. तथापि, आवश्यकतेनुसार उच्चस्तर समिती बैठकांचे आयोजन सदस्य सचिव हे करतील. पर्यटन संचालनालयाकडून छाननीनंतर प्रस्ताव उच्चस्तर समितीच्या बैठकीच्या किमान २० दिवस अगोदर ऑनलाईन प्रणालीव्दारे प्राप्त होणे आवश्यक राहील.

ii. पर्यटन संचालनालय यांचेमार्फत प्राप्त होणाऱ्या प्रायोजकत्वाच्या प्रस्तावांबाबत मा.मंत्री (पर्यटन) यांना शिफारस करणे.

iii. प्रस्तावात नमूद प्रत्येक प्रदेयासाठी (Deliverables) देय होऊ शकणारे आर्थिक सहाय्य निश्चित करणे.

iv. राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय स्तरावरील वर्तमानपत्रे, मासिके, रेडिओ चॅनेल्स् व इलेक्ट्रॉनिक मिडीया (दूरचित्रवाहीन्या) यांबाबत पर्यटन संचालनालयाकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यास व ते DAVP / DGIPR / Sole Rights दराप्रमाणे प्रायोजकत्व असल्यास त्यांना एकलस्त्रोत म्हणून जाहिरात करण्यास मान्यता देण्याबाबत मा.मंत्री (पर्यटन) यांना शिफारस करणे.

**३) प्रायोजकत्वाबाबत अर्ज सादर करावयाची कार्यपद्धती -:**

i. प्रायोजकत्वाबाबतचे प्रस्ताव **परिशिष्ट“-अ”** येथील नमुन्यात https://www.maharashtratourism.gov.in या संकेतस्थळावर ऑनलाईन प्रणालीव्दारे कार्यक्रमाच्या किमान ३० दिवस अगोदर सादर करणे बंधनकारक राहील.

ii. पर्यटन विभागामार्फत आंतरराष्ट्रीय / राष्ट्रीय / राज्यस्तरावरील प्रायोजकत्व कार्यक्रमांबाबत अनुज्ञेय असलेल्या प्रस्तावांची यादी सोबतच्या **परिशिष्ट-“ब”** मध्ये नमूद आहे. त्यानुसार अनुज्ञेय कार्यक्रमांचेच प्रस्ताव ऑनलाईन प्रणालीव्दारे सादर करण्यात येतील.

iii. उपरोक्तनुसार विहीत नमुन्यात अर्ज प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून १० कार्यालयीन दिवसांमध्ये पर्यटन संचालनालय सखोल छाननी करुन, उच्चस्तर समितीच्या बैठकीच्या किमान २० दिवस अगोदर स्वंयस्पष्ट अभिप्रायासह ऑनलाईन प्रणालीव्दारे प्रस्ताव पर्यटन विभागास सादर करील.

iv. सदर प्रणाली तयार करुन, ऑनलाईन फ्लॅश करणे व त्याचे व्यवस्थापन, परिचालन, अद्ययावतीकरण, प्रणाली वापरण्याबाबत सर्व संबंधितांना प्रशिक्षण देणे, उपलब्ध माहितीचे संकलन व मालकी हक्क शासनाकडे राहील याची दक्षता व सुरक्षा घेण्याची जबाबदारी सर्वस्वी पर्यटन संचालनालयाकडे असेल. यासाठी लागणारा खर्च या योजनेअंतर्गत उपलब्ध करुन देण्यात येईल.

v. या योजनेअंतर्गत सर्व प्रस्ताव शासनाने निर्देश दिल्याखेरीज ऑनलाईन प्रणालीमार्फतच सादर करण्यात येतील, याबाबत पर्यटन संचालनालयाने दक्षता घ्यावी.

**४) प्रायोजकत्वाबाबतच्या प्रस्तावांना मान्यता देण्याबाबतची कार्यपद्धती :-**

पर्यटन संचालनालय यांचेमार्फत प्राप्त होणाऱ्या प्रायोजकत्वाच्या प्रस्तावांना मान्यता देण्याचे अधिकार मा.मंत्री (पर्यटन) यांना असतील.

**५) प्रस्ताव सादर करण्यासाठी सर्वसाधारण अटी व शर्ती -:**

i. अर्ज करणारी संस्था नोंदणीकृत संस्था असणे आवश्यक आहे.

ii. संबंधित आयोजकांना कार्यक्रमाचे आयोजन करण्यासाठीचा अनुभव असणे आवश्यक आहे. (किमान १ वर्षे कार्यक्रमाचे यशस्वी आयोजन)

iii. अर्ज करणारी संस्था / कंपनी शासनाच्या काळ्या यादीत नसावी.

iv. खाजगी आयोजकांकडून महाराष्ट्र शासन विरोधात कोणतेही न्यायालयीन प्रकरण दाखल नसावे.

v. वित्तीय सहाय्याचे प्रस्ताव पर्यटन विभागास कार्यक्रमापूर्वी किमान ३० दिवस अगोदर प्राप्त होणे गरजेचे आहे. या कालावधीपेक्षा कमी कालावधी असताना प्राप्त होणारे प्रस्ताव पर्यटन संचालनालय व उच्चस्तरीय समितीसमोर कोणत्याही परिस्थितीत विचारार्थ ठेवण्यात येणार नाहीत.

vi. कोणत्याही परिस्थितीमध्ये / कोणत्याही कारणास्तव या कार्यक्रमाचे प्रस्ताव कार्योत्तर मंजूरीसाठी सादर केले जाणार नाहीत.

vii. कार्यक्रमाच्या आयोजनानंतर कार्यक्रमांचा अहवाल खर्चाच्या तपशीलांसह (छायाचित्र, Video, CD, सनदी लेखापालांनी प्रमाणित केलेल्या खर्चाच्या विवरणपत्रासह (Statement

of Expenditure) सात कार्यालयीन दिवसात पर्यटन संचालनालयाकडे सादर करणे आवश्यक राहील.

viii. पर्यटन विभागाशी निगडीत लोगो आणि चिन्हे यांचा वापर पर्यटन विभागाच्या सहमतीने करण्यात येईल.

ix. पर्यटन विभागामार्फत मंजूर केलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच संबंधित आयोजकांनी खर्च करावा. मर्यादेपेक्षा अधिक खर्च झाल्याचे नमूद करुन, अतिरिक्त निधी मागणी मंजूरीबाबतचा प्रस्ताव कोणत्याही परिस्थितीत विभागास सादर करण्यात येऊ नये.

x. विभागामार्फत प्रायोजकत्व प्रस्तावित करताना त्या कार्यक्रमामध्ये पर्यटन विभागाच्या प्रसिध्दी दालनासाठी तरतूद करण्यात यावी.

xi. पर्यटन दालनाच्या माध्यमातून प्रसिध्दी व अंमलबजावणीसाठी प्रायोजकत्व यांचे प्रमाण ७५:२५ असे असावे.

xii. अर्ज सादर करताना कोणत्याही व्यक्ती अथवा संस्थेची बौद्धिक संपदा अधिकाराचे ( IPR) उल्लंघन होणार नाही याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.

xiii. कार्यक्रमाच्या दरम्यान उपस्थितांचे नोंदणी व्यवस्थापन करणे आवश्यक राहील.

xiv. पर्यटन विभागाच्या दालनामध्ये MTDC/ LIDCOM/ MSHC/ MSRDC इ. संस्थांना आवश्यकतेनुसार सहभागी करुन घेण्यात यावे.

xv. सदर योजनेअंतर्गत केवळ पर्यटन विकासासाठी संबंधित प्रस्ताव विभागास सादर करण्यात यावेत. सांस्कृतिक, धार्मिक, शैक्षणिक तसेच अन्य विषयांशी संबंधित प्रस्ताव त्या त्या विभागास सादर करण्यात यावे.

xvi. सदर योजनेंतर्गत आंतरराष्ट्रीय / राष्ट्रीय / राज्यस्तरावरील कार्यक्रमांसाठी प्रायोजकत्व मंजूर झाल्यानंतर राज्य शासनाने काही मार्गदर्शक सूचना दिल्यास त्याचे पालन करण्याची जबाबदारी संबंधित कार्यक्रमाच्या आयोजकांची असेल.

xvii. पर्यटन विकासाला चालना मिळण्यासाठी आयोजकांसोबत पर्यटन संचालनालय व महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ व संबंधित जिल्हाधिकारी याच्या संयुक्त विद्यमाने प्रायोजकत्व कार्यक्रम आयोजित करणे शक्य असल्यास त्यास प्रथम प्राधान्य देण्यात यावे.

xviii. सदर कार्यक्रमाची प्रसिध्दी पर्यटन विभागाच्या सर्व सामाजिक माध्यमातून (Social Media) करणे बंधनकारक राहील.

६. पर्यटन विभागामार्फत आंतरराष्ट्रीय / राष्ट्रीय / राज्यस्तरावरील प्रायोजकत्व कार्यक्रमांबाबत अनुज्ञेय असलेल्या प्रस्तावांची यादी सोबतच्या **परिशिष्ट-"ब"** मध्ये नमूद आहे. तथापि, महाराष्ट्राच्या पर्यटनाला चालना व विशेष प्रसिद्धी देणाऱ्या कार्यक्रमांकरीता उच्चस्तर समितीस्तरावर विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रायोजकत्व उपलब्ध करुन देण्याबाबत उचित निर्णय घेण्यात येईल.

७. पर्यटन विभागामार्फत आंतरराष्ट्रीय / राष्ट्रीय / राज्यस्तरावरील प्रायोजकत्व कार्यक्रमांसाठी उपलब्ध करुन द्यावयाच्या निधीसाठी पर्यटन विभाग लेखाशिर्ष ३४५२ १९३१ प्रसिध्दी (कार्यक्रम) अंतर्गत त्या त्या वर्षी प्राप्त होणाऱ्या वार्षिक नियतवाटपापैकी ठराविक रक्कम राखीव ठेवण्यात यावी.

८. सदर योजनेंतर्गत येणारा खर्च पर्यटन प्रसिध्दीसाठी असलेल्या लेखाशिर्ष ३४५२ १९३१ प्रसिध्दी (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली त्या त्या वर्षाखाली मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४३०१८०६०५४५२३असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH VITHAL ROKADE

Digitally signed by SANTOSH VITHAL ROKADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ECF4A9ABE84C70DE989C3669424C12B6CADCB583D500FE489CE8727916E0BBEE, cn=SANTOSH VITHAL ROKADE
Date: 2025.04.30 18:06:47 +05'30'

**(संतोष जया विठ्ठल रोकडे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन,मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
९. मा. राज्यमंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
१०. मा. सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
११. मा. सर्व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई
१२. मा. सर्व विधानसभा सदस्य, विधानमंडळ, मुंबई
१३. मा.मुख्य सचिव
१४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग
१५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग
१६. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग
१७. मंत्रालयातील सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
१८. प्रधान सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
२०. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२१. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
२२. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
२३. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
२५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२७. केंद्रीय पर्यटन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली
२८. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
२९. वित्त विभाग (का.व्यय-१५/अर्थ-११) मंत्रालय, मुंबई.
३०. सामान्य प्रशासन विभाग, का.३४
३१. अवर सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
३२. निवडनस्ती (पर्यटन-३)

## परिशिष्ट 'अ'

### प्रायोजकत्वाबाबत तपासणी सूची.

| अ.क्र. | मुद्दे | माहिती /कागदपत्रे |
|---|---|---|
| १) | संस्थेचे नोंदणी प्रमाणपत्र व तारीख | |
| २) | संस्थेचा प्रकार (खाजगी संस्था, भागीदार संस्था, स्थानिक स्वराज्य संस्था, सेवाभावी संस्था व इतर संस्था) | |
| ३) | संस्थाचा कार्यानुभव (किमान १ वर्षे कार्यक्रमाचा अनुभव असणे आवश्यक आहे.) | |
| ४) | सदर महोत्सव / कार्यक्रमाचा एकूण अंदाजित खर्च (लेखा परिक्षित) प्राप्त होणारे प्रयोजकत्व निधी उपलब्धतेबाबतची माहिती (लेखापरीक्षित) तसेच त्यामधून होणारा नफा/तोटा तपशील. | |
| ५) | या पूर्वी महोत्सव कार्यक्रम केला असल्यास त्याबाबतचा तपशील / फलनिष्पती अहवाल | |
| ६) | सदर महोत्सवात/कार्यक्रमात सहभागी होणाऱ्या सह-प्रायोजक, सहभागी संस्था यांचा तपशील तसेच कार्यादेशाची प्रत. | |
| ७) | गत महोत्सवामध्ये/कार्यक्रमामध्ये उपस्थित असणाऱ्या देशी-विदेशी पर्यटकांचा तपशील | |
| ८) | सदर प्रस्तावासोबत महोत्सवाचा सविस्तर तपशिल उदा. महोत्सवाचे नाव / स्थळ / कालावधी / कार्यक्रमाची रुपरेषा / स्वरूप / एकूण कार्यक्रम खर्चापैकी पर्यटन विभागाकडून अपेक्षित प्रायोजकत्व | |
| ९) | आयोजकांनी कार्यक्रमासाठी लागणाऱ्या विविध परवानग्या (शासकीय) घेतल्या आहेत की नाही (असल्यास संबंधित कागदपत्रे). | |
| १०) | कार्यक्रमादरम्यान सुरक्षा विषयक करण्यात येणाऱ्या उपाययोजना | |
| ११) | सदर महोत्सव / कार्यक्रमात सहभागी होण्याकरिता आयोजकानी पर्यटन विभागास देऊ केलेले प्रदेये (Deliverables). | |
| १२) | संस्थेने या पूर्वी किती कार्यक्रम केले व त्यापोटी शासनाला करमणूक कर / GST भरणा केलेला असल्यास त्याबाबतच्या पावत्या उपलब्ध करुन देणे. | |
| १३) | अर्ज करणारी संस्था / कंपनो शासनाच्या काळ्या यादीत समावेश आहे किंवा कसे ? तसेच आयोजकांद्वारे महाराष्ट्र शासन विरोधात कोणतेही न्यायालयीन प्रकरण दाखल आहे किंवा कसे ? | |
| १४) | या कार्यक्रमाव्दारे किती दूर ऑपरेटर्स, इन्फ्लुएन्सर्स, ब्लॉगर यांना आमंत्रित केले आहे ? त्यांचे निकष काय ठेवण्यात आले आहेत ? | |
| १५) | या कार्यक्रमाव्दारे/महोत्सवाव्दारे महाराष्ट्र पर्यटनाबाबत लेख, जाहिरात, मुलाखत प्रसिध्द करण्यात येईल, तयाची संख्या, आकार इ. तपशील देण्यात यावा. | |
| १६) | या कार्यक्रमास ख्यातनाम व्यक्ती (Celebrities) आमंत्रित असल्यास त्यांच्याव्दारे महाराष्ट्र टुरिझम/पर्यटन स्थळांबाबत काही Reel, tweet, Instagram. इ. चा तपशील पर्यटन संचालनालयास सादर करावा. | |
| १७) | या महोत्सवाव्दारे/दरम्यान किती फॅम टूर्स/परिचय सहलीचे आयोजन केले आहे त्याचा तपशील | |
| १८) | या कार्यक्रमात पर्यावरणास हाणिकारक ठरणाऱ्या प्रतिबंधीत प्लॅस्टीक, थर्माकोल इ.चा वापर होणार नाही याचे हमीपत्र सादर करावे. | |
| १९) | या कार्यक्रमात पर्यटन क्षेत्रात उत्कृष्ट काम करणाऱ्या महिला, स्टार्ट अप, होम-स्टे, कृषी पर्यटन केंद्र, पर्यटन गाव यांचा सत्कार आहे का? वा त्यांना प्रसिध्दी देण्यात येणार आहे का ? | |
| २०) | कार्यक्रमाचा पर्यटन वाढीच्या दृष्टीने फलनिष्पती अहवाल सादर करावा. | |

****

## परिशिष्ट-“ब”

## प्रायोजकत्वाकरीता अनुज्ञेय कार्यक्रमांबाबतचा तपशील.

१. स्थानिक/राज्य / राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय महोत्सव (राष्ट्रीय चित्रपट पुरस्कार, विदर्भ महोत्सव, इ.)
२. पर्यटनास प्रसिध्दी देणाऱ्या लोककला, नृत्य, संगीत यांचे कार्यक्रम
३. पर्यटन विषयक प्रदर्शने / साहित्य/ चित्रपट / नाटक क्षेत्राशी निगडीत संमेलने/ क्रीडा स्पर्धा / चर्चासत्रे / सांस्कृतिक कार्यक्रम / पर्यटन महोत्सव /पर्यटन परिषद / संमेलने इत्यादी
४. विविध दूरचित्रवाहिनीव्दारे पर्यटनाशी संबंधित एफएम रेडिओ, चॅनेल्स, व छपाई माध्यम संस्था यांच्याशी निगडीत प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने TRP, Listening, Audiences, Print circulations etc. विचारात घेऊन मराठी, इंग्रजी, हिंदी व इतर प्रादेशिक भाषेतील कार्यक्रम.
५. पर्यटनाशी निगडीत स्थानिक पातळीवरील आयोजित करण्यात येणारे उपक्रम
६. पर्यटन स्थळांशी संबंधित सांस्कृतिक कार्यक्रम
७. वारसा (Heritage) दर्शन व प्रचाराचे कार्यक्रम
८. पर्यटन विकासासाठी जनजागृती मोहिमा
९. भटकंती व साहसी पर्यटन (adventure tourism) कार्यक्रम
१०. स्थानीय खाद्य महोत्सव (फूड फेस्टिव्हल्स)
११. हस्तकला व लोककला प्रदर्शन/विक्री मेळावे
१२. युवा सहभाग असलेले पर्यटक प्रोत्साहन कार्यक्रम
१३. स्थानिक पारंपरिक खेळांचे आयोजन (जसे की मलखांब, कबड्डी इ.)
१४. पर्यटन स्थळांवरील स्वच्छता व संवर्धन मोहीम
१५. पर्यटन गाईड प्रशिक्षण कार्यशाळा / सेमिनार
१६. पर्यटन छायाचित्रण / लघुपट स्पर्धा
१७. हेरिटेज वॉक / सायकल टूर्सचे आयोजन
१८. किल्ले, मंदिर, ऐतिहासिक स्थळांवरील कार्यक्रम
१९. समुद्रकिनारी किंवा निसर्ग पर्यटन स्थळांवरील उपक्रम
२०. विद्यार्थी व तरुणांसाठी पर्यटनावर आधारित स्पर्धा / शिबिरं
२१. मास टुरिझम ऐवजी स्थानिक व टिकाऊ पर्यटन प्रोत्साहन करणारे उपक्रम
२२. पर्यटन स्थळांच्या माहिती पुस्तिका / मार्गदर्शक तयार करणारे प्रकल्प
२३. पर्यटनाला चालना देणाऱ्या चित्रफिती, डिजिटल माध्यमांतील उपक्रम
२४. महाराष्ट्राच्या पर्यटनाला हातभार लावणाऱ्या, विशेष प्रसिद्धी देणाऱ्या कार्यक्रमांकरीता देखील विहित अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रायोजकत्व अनुज्ञेय राहील.
२५. व्यवसायिक कंपन्यांचे जाहिरातप्रधान कार्यक्रम
२६. राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय / राज्यपातळीवरील मनोरंजनप्रधान कार्यक्रम

******